भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील कनिष्ठ भूवैज्ञानिक यांचा सेवाबाह्य कालावधी नियमित करणे, त्यांना अनुज्ञेय वेतन व भत्ते अदा करणे व वेतनवाढी मुक्त करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आपना-२०१४/प्र.क्र.२००/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
क्रॉफर्ड, मार्केट जवळ, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १८ डिसेंबर, २०१८.

वाचा :-

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२३०९/प्र.क्र.३१४/पापु-१५, दिनांक ०४/०५/२०१२.
२) **मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाचे आदेश, दिनांकः** १२/१०/२०१२ व ३१/१०/२०१२
३) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२६१२/प्र.क्र.१८९/भाग-२/पापु-१५, दिनांक ०९/०१/२०१३
४) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२६१३/प्र.क्र.१७१/पापु-१५, दिनांक १२/०२/२०१५

प्रस्तावना :-

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कनिष्ठ भूवैज्ञानिक, गट-ब या पदावर ७८ उमेदवारांना नामनिर्देशनाने दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीसाठी नियुक्ती देण्यात आली होती. कनिष्ठ भूवैज्ञानिक पदाच्या सेवाप्रवेश नियमानुसार व नियुक्तीच्या शासन आदेशातील अटी-शर्थीनुसार नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या कनिष्ठ भूवैज्ञानिकांनी विहित मुदतीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या उमेदवारांपैकी ४५ उमेदवार विहित मुदतीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यामुळे संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये या कनिष्ठ भूवैज्ञानिकांच्या सेवा दिनांक ०४/०५/२०१२ पासून समाप्त करण्यात आल्या होत्या. या आदेशान्वये सेवा समाप्त करण्यात आल्याने बाधित झालेल्या कनिष्ठ भूवैज्ञानिकांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणात विविध अर्जान्वये याचिका दाखल केल्या होत्या.

मा. न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये ३७ उमेदवारांना भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या सेवेत कनिष्ठ भूवैज्ञानिक या पदावर पुनर्स्थापित करण्यात आले. या शासन निर्णयातील प्रपत्र-अ मध्ये दर्शविलेले अधिकारी तिसऱ्या प्रयत्नात परीक्षा उत्तीर्ण झालेले असल्याने त्यांना मा. न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार सर्व लाभांसह शासन सेवेत पुनर्स्थापित करण्यात आले. तर, शासन निर्णयातील प्रपत्र-ब मध्ये दर्शविलेले अधिकारी तिसऱ्या प्रयत्नात अनुत्तीर्ण झालेले असल्याने अशा अधिकाऱ्यांना विभागीय परीक्षेची आणखी एक संधी उपलब्ध करून देण्यात आली.

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत दिनांक ०४ व ०५ जुलै, २०१३ रोजी आयोजित करण्यात आलेल्या विभागीय परीक्षेच्या दिनांक ०५/१२/२०१३ रोजी जाहीर झालेल्या निकालानुसार प्रपत्र-ब मधील सर्व २१ अधिकारी उत्तीर्ण झाले. या २१ अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी ते परीक्षा उत्तीर्ण झाल्याच्या दिनांकापासून शासन मान्यतेने समाप्त करण्यात आला आहे. तथापि, या आदेशांमध्ये संबंधित कनिष्ठ भूवैज्ञानिक यांना पुढील वेतनवाढ देण्याबाबत व त्यांचा सेवाबाह्य कालावधी कशाप्रकारे नियमित करण्यात यावा आणि या सेवाबाह्य कालावधीतील अनुज्ञेय वेतन व भत्ते त्यांना कशाप्रकारे देय राहतील याबाबत स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील, असे नमूद करण्यात आले होते.

प्रकरणाची वरील वस्तुस्थिती विचारात घेता, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील जे कनिष्ठ भूवैज्ञानिक अतिरिक्त संधीमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण झाले आहेत, त्यांचा सेवाबाह्य कालावधी नियमित करण्याची तसेच या कालावधीतील अनुज्ञेय वेतन-भत्ते अदा करण्याची आणि संबंधित कनिष्ठ भूवैज्ञानिक यांना दुसरी आणि त्यापुढील वेतनवाढी मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेत नमूद केलेली पार्श्वभूमी विचारात घेऊन, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील खालील कनिष्ठ भूवैज्ञानिक यांचा सेवाबाह्य कालावधी त्यांच्या नावापुढे स्तंभ क्रमांक ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे त्यांच्या खाती शिल्लक असलेल्या रजेची परिगणना करून या रजेच्या मोबदल्यात नियमित करण्यात येत आहे. तसेच हा कालावधी “कर्तव्य कालावधी” म्हणून या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात येत आहे. संबंधित कनिष्ठ भूवैज्ञानिक यांचा सेवाबाह्य कालावधी त्यांच्या खाती शिल्लक असलेल्या रजेमधून नियमित करण्यात येत असल्याने, या कालावधीतील अनुज्ञेय वेतन व भत्ते संबंधिताना मंजूर करण्यात येत आहेत. तसेच संबंधितांच्या वार्षिक वेतनवाढी शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक २२/०४/२००९ मधील नियम क्रमांक १० मधील तरतुदीनुसार मुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | सेवाबाह्य कालावधी | दिनांक ०३/०५/२०१२ रोजी शिल्लक असलेल्या रजा | नियमित करण्यात आलेला कालावधी व प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती तरूणा धीरज पाटील | ०४/०५/२०१२ ते १६/०१/२०१३ (२५८ दिवस) | ७६ दिवस अर्जित<br>७४ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते १८/०७/२०१२ (७६ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- १९/०७/२०१२ ते २४/०८/२०१२ (३७ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- २५/०८/२०१२ ते १६/०१/२०१३ (१४५ दिवस) |
| २ | श्रीमती दिप्ती दिपक तिजारे (चोले) | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | १६८ दिवस अर्जित<br>१३२ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते १८/१०/२०१२ (१६८ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- १९/१०/२०१२ ते २३/१२/२०१२ (६६ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- २४/१२/२०१२ ते १४/०१/२०१३ (२२ दिवस) |
| ३ | श्रीमती किशोरी संभाजी केळकर | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | ९२ दिवस अर्जित<br>३२ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते ०३/०८/२०१२ (९२ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- ०४/०८/२०१२ ते १९/०८/२०१२ (१६ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- २०/०८/२०१२ ते १४/०१/२०१३ (१४८ दिवस) |
| ४ | श्री. राजेश रामचंद्र गावंडे | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | १६२ दिवस अर्जित<br>५१ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते १२/१०/२०१२ (१६२ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- १३/१०/२०१२ ते ०६/११/२०१२ (२५ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- ०७/११/२०१२ ते १४/०१/२०१३ (६९ दिवस) |
| ५ | श्री. राजीव गोपाळराव गवई | ०४/०५/२०१२ ते १५/०१/२०१३ (२५७ दिवस) | १९५ दिवस अर्जित<br>१०६ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते १४/११/२०१२ (१९५ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- १५/११/२०१२ ते ०६/०१/२०१३ (५३ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- ०७/०१/२०१३ ते १५/०१/२०१३ (०९ दिवस) |
| ६ | श्री. अमित वसंतराव वरघट | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | १५० दिवस अर्जित<br>४८ दिवस अर्धवेतनी | श्री. वरघट यांचे दिनांक ३१/०७/२०१६ रोजी निधन झालेले असल्यामुळे त्यांच्या निधनापूर्वी त्यांच्या खाती शिल्लक असलेल्या अर्जित रजांचे रोखीकरण करण्यात आले आहे. त्यामुळे त्यांचा सेवाबाह्य कालावधी विशेष बाब म्हणून नियमित करण्यात येत आहे. |
| ७ | श्री.ललित ब्रिजलाल वायकर | ०४/०५/२०१२ ते १५/०१/२०१३ (२५७ दिवस) | १४७ दिवस अर्जित<br>११९ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते २७/०९/२०१२ (१४७ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- २८/०९/२०१२ ते २५/११/२०१२ (५९ दिवस) |

| अ.क्र. | नाव | सेवाबाह्य कालावधी | दिनांक ०३/०५/२०१२ रोजी शिल्लक असलेल्या रजा | नियमित करण्यात आलेला कालावधी व प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | | (३) असाधारण रजेद्वारे- २६/११/२०१२ ते १५/०१/२०१३ (५१ दिवस) |
| ८ | श्री. प्रमोद हिम्मतराव खैरनार | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | १६५ दिवस अर्जित<br>१३४ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते १५/१०/२०१२ (१६५ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- १६/१०/२०१२ ते २०/१२/२०१२ (६७ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- २१/१२/२०१२ ते १४/०१/२०१३ (२४ दिवस) |
| ९ | श्री. विजयंत गिरीराज जैन | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | ८८ दिवस अर्जित<br>९५ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते ३०/०७/२०१२ (८८ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- ३१/०७/२०१२ ते १५/०९/२०१२ (४७ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- १६/०९/२०१२ ते १४/०१/२०१३ (१२१ दिवस) |
| १० | श्री. अजिंक्य अविनाश काटकर | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | १७६ दिवस अर्जित<br>१२२ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते २६/१०/२०१२ (१७६ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- २७/१०/२०१२ ते २६/१२/२०१२ (६१ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- २७/१२/२०१२ ते १४/०१/२०१३ (१९ दिवस) |
| ११ | श्रीमती अरुणा भीमराव खरात | ०४/०५/२०१२ ते १५/०१/२०१३ (२५७ दिवस) | १८३ दिवस अर्जित<br>१३२ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते ०२/११/२०१२ (१८३ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- ०३/११/२०१२ ते ०७/०१/२०१३ (६६ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- ०८/०१/२०१२ ते १५/०१/२०१३ (०८ दिवस) |
| १२ | श्रीमती माधवी सुरेश दुबे | ०४/०५/२०१२ ते १६/०१/२०१३ (२५८ दिवस) | २९ दिवस अर्जित<br>४० दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते ०१/०६/२०१२ (२९ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- ०२/०६/२०१२ ते २१/०६/२०१२ (२० दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- २३/०६/२०१२ ते १६/०१/२०१३ (२०९ दिवस) |
| १३ | श्री. राजेश भागवत शेटे | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | १०९ दिवस अर्जित<br>७८ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते १९/०८/२०१२ (१०९ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- २०/०८/२०१२ ते २७/०९/२०१२ (३९ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- २८/०९/२०१२ ते १४/०१/२०१३ (१०८ दिवस) |

| अ.क्र. | नाव | सेवाबाह्य कालावधी | दिनांक ०३/०५/२०१२ रोजी शिल्लक असलेल्या रजा | नियमित करण्यात आलेला कालावधी व प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १४ | श्रीमती मृणालिनी ओंकार लोखंडे | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | ५० दिवस अर्जित १२६ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते २२/०६/२०१२ (५० दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- २३/०६/२०१२ ते २४/०८/२०१२ (६३ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- २५/०८/२०१२ ते १४/०१/२०१३ (१४३ दिवस) |
| १५ | श्रीमती सुजाता दिगंबर हिंगोले | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | १७४ दिवस अर्जित १२६ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते २४/१०/२०१२ (१७४ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- २५/१०/२०१२ ते २६/१२/२०१२ (६३ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- २७/१२/२०१२ ते १४/०१/२०१३ (१९ दिवस) |
| १६ | श्री. कृष्णा बकुळदास देशपांडे | ०४/०५/२०१२ ते १४/०१/२०१३ (२५६ दिवस) | १५९ दिवस अर्जित ११९ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते ०९/१०/२०१२ (१५९ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- १०/१०/२०१२ ते ०७/१२/२०१२ (५९ दिवस)<br>(३) असाधारण रजेद्वारे- ०८/१२/२०१२ ते १४/०१/२०१३ (३८ दिवस) |
| १७ | श्री.शंकर बाबुराव सरकाळे | ०४/०५/२०१२ ते १५/०१/२०१३ (२५७ दिवस) | १९५ दिवस अर्जित १२७ दिवस अर्धवेतनी | (१) अर्जित रजेद्वारे- ०४/०५/२०१२ ते १४/११/२०१२ (१९५ दिवस)<br>(२) अर्धवेतनी रजेद्वारे- १५/११/२०१२ ते १५/०१/२०१३ (६२ दिवस) |

वरीलप्रमाणे नियमित करण्यात आलेला सेवाबाह्य कालावधी हा केवळ सेवानिवृत्तीसाठी ग्राह्य धरण्यात यावा. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे यांना कळविण्यात येते की, वरील तक्त्यात दर्शविलेल्या कनिष्ठ भूवैज्ञानिकांचा सेवाबाह्य कालावधी त्यांच्या खाती शिल्लक असलेल्या रजेमधून नियमित करण्यात आलेला असल्याने, या कालावधीतील अनुज्ञेय वेतन व भत्ते संबंधित कनिष्ठ भूवैज्ञानिक यांना तातडीने अदा करण्यात यावेत. तसेच संबंधित कनिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या दिनांक ०१/०७/२००७ पासून प्रलंबित असलेल्या दुसऱ्या व त्यापुढील वेतनवाढी नियमितपणे क्रमाक्रमाने शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक २२/०४/२००९ मधील नियम क्रमांक १० च्या तरतुदीनुसार मुक्त करण्यात याव्यात.

श्री. प्रशांत दादाजी शहारे, कनिष्ठ भूवैज्ञानिक व श्री. विक्रांत सुभाष ठाकूर, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांना या विभागाचा संदर्भाधीन क्रमांक ४ येथील दिनांक १२/०२/२०१५ रोजीचा शासन निर्णय लागू करण्यात येत असून, संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे

यांना कळविण्यात येते की, संबंधितांना अनुज्ञेय वेतन व भत्ते तातडीने अदा करण्यात यावेत. तसेच संबंधित कनिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या दिनांक ०१/०७/२००७ पासून प्रलंबित असलेल्या दुसऱ्या व त्यापुढील वेतनवाढी नियमितपणे क्रमाक्रमाने शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक २२/०४/२००९ मधील नियम क्रमांक १० च्या तरतुदीनुसार मुक्त करण्यात याव्यात.

प्रस्तुत शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९३/२०१८, दिनांक २८/०८/२०१८ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७९/२०१८/सेवा-३, दिनांक ३०/०८/२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४२१/१८/सेवा-३, दिनांक २७/०९/२०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 201812181419111828 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2018.12.18 16:43:52 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), मुंबई
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), नागपूर.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
८. उपसंचालक (सर्व), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
९. वरिष्ठ भूवैज्ञानिक (सर्व), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
१०. कनिष्ठ भूवैज्ञानिक (सर्व संबंधित), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
११. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५)